**शांतीकुंज शासकिय महिला वसतीगृह, जालना या संस्थेकरीता भाडेतत्वावर घेण्यात आलेल्या इमारतीच्या भाडे मंजुरीचा प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः-मबावि २०२४/प्र.क्र.२३६/का.०२**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १० मार्च, २०२५

**वाचा:-**

१. वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५,
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/मवि/इमा.भाडे मंजुरी/प्रस्ताव/२०२४-२५/४८३६, दि.२७.०३.२०२४.
३. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/मवि/इमा.भाडे मंजुरी/प्रस्ताव/२०२४-२५/१२३, दि.०६.०१.२०२५.

**प्रस्तावना-**

शांतीकुंज शासकिय महिला वसतीगृह, जालना या संस्थेकरिता दि.०१.१०.२०२३ ते दि.३०.०९.२०२४ (१ वर्षे) या कालावधीसाठीकरीता भाडेतत्वावर घेण्यात आलेल्या इमारतीचा भाडे मंजुरीच्या प्रस्तावास कार्योत्तर मान्यता देण्याबाबत संदर्भाधिन क्र.२ व ३ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सदर इमारतीचा भाडे प्रस्तावास कार्योत्तर मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शांतीकुंज शासकिय महिला वसतीगृह, जालना ही संस्था सौ. स्वाती काळबंडे व ॲड श्री.संजय काळबंडे यांच्या मालकीच्या अयोध्या नगर, अंबड रोड, जालना एकूण ४६६.३७ चौ.मी. क्षेत्रफळ असलेली इमारत दि.०१.१०.२०२३ ते ३०.०९.२०२४ (१ वर्षे) या कालावधीसाठीकरीता करण्यात आलेल्या करारनाम्यास व सदर इमारतीसाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना मार्फत निश्चित करण्यात आलेल्या दरमहा रु.९७,६६५/- (अक्षरी रुपये सत्त्यान्नव हजार सहाशे पासष्ठ फक्त) या भाडे रक्कमेस कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर इमारतीच्या भाडेपोटी आवश्यक असणारा निधी आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेस्तरावरून शांतीकुंज शासकिय महिला वसतीगृह, जालना या संस्थेस उपलब्ध करून द्यावा.

३. सदर इमारतीच्या भाड्यापोटी होणारा खर्च हा लेखाशिर्ष २२३५ १२५४ (योजनेत्तर) अंतर्गत भाडेपट्टी व कर या उद्धिष्टासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३ /प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग २ दिनांक १७/०४/२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक अ.क्र.१०, मुंबई वित्तीय नियम १९५९ अंतर्गत प्रदान वित्तीय अधिकार आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम-१९६५ मधील नियम १४७ (क) खालील टीप-१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांगणक सांकेतांक २०२५०३१०१२१५१२०५३० असा आहे. हा शासन शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASAD VINAYAKRAO KULKARNI

Digitally signed by PRASAD VINAYAKRAO KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=83b8be9eb843dd6eccbd6aa4f9eecd0b5f7aca67ff32b2eef7b9ed2d85ab9442, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D19730DDF785210D50C28934B75E9B7B4F5D06B6181CF1901CE3E48EC9E3985, cn=PRASAD VINAYAKRAO KULKARNI
Date: 2025.03.10 12:18:39 +05'30'

**( प्र. वि. कुलकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल १ व २ (लेखा अनुज्ञेयता)/लेखा परिक्षा, मुंबई/नागपूर.
५) सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा, अधिकारी, मुंबई.
८) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
९) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, जालना.
१०) अधीक्षक, शांतीकुंज शासकिय महिला वसतीगृह, जालना.
११) महिला व बाल विकास विभाग, कार्यासन ४ (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती (का.२).